आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण.
(राज्य हिस्सा लेखाशिर्ष - २२१० G४९४)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/प्र.क्र.०५/कार्या.-०६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ६ जुलै, २०२०.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२० /प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६.०४.२०२०.
२) शासन निर्णय, वित्त विभाग,क्र. अर्थसं-२०२० /प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ४.०५.२०२०.
३) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.प्रजयो- २०२० /प्र.क्र. ८३/ आरोग्य-६.

शासन निर्णय:-

सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेकरिता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०३-ग्रामीण आरोग्य सेवा-विषमचिकित्सा, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, ०१-जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना--राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (राज्य हिस्सा) ( २२१० G ४९४ ) ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर), या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या वर्षात रु.२०००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे.

२. कोरोना विषाणूमुळे उद्भवलेल्या परिस्थितीवर मात करण्याच्या अनुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभागास प्राधान्य विभाग म्हणून निश्चित केले आहे. यानुसार सार्वजनिक आरोग्य विभागाने क्र.३ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (राज्य हिस्सा) लेखाशिर्ष ( २२१० G ४९४), ३१- सहायक अनुदाने ( वेतनेतर ) या खालील अर्थसंकल्पित तरतूदीतून रू.६,०५,५२,२२९/- (अक्षरी रूपये सहा कोटी पाच लाख बावन्न हजार दोनशे एकोणतीस फक्त) इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रक अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेला खर्च, तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट याबाबत माहितीचा त्रैमासिक अहवाल, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक तसेच आदिवासी विकास यांना सादर करण्याबाबत दक्षता घ्यावी.

४. विभाग प्रमुख व नियंत्रक अधिकारी यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

६. सदर योजनेंतर्गत प्रत्यक्षात अनुसूचित जमाती लाभार्थी कुटूंबांना पुरविण्यात आलेले विमा संरक्षण व प्रत्यक्षात देण्यात आलेला लाभ या बाबतची आकडेवारी सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत आदिवासी विकास विभागास सादर करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** क्र.१ अन्वये प्राप्त अधिकारात व वित्त विभागाच्या दि.१७.०६.२०२० च्या टिप्पणीन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६०५१८२८४३१७२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.07.06 15:13:37 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. सर्व जिल्हाधिकारी,महाराष्ट्र राज्य.
६. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. अधिदान व लेखधिकारी,मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-६), मंत्रालय, मुंबई
१३. कार्यासन अधिकारी (का.क्र. ८ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.